# हेलेन केलर

जेन सटक्लिफ, चित्र: ऐलेन



मराठी: अश्विनी



## टस्कुम्बिया, अलबामा १८८६

हेलेन केलरने आपल्या हाताने गरम, मोठ्या केसांना स्पर्श केला. तिची बोटे अजून खाली गेली.तिला काहीतरी ओलसर आणि गुळगुळीत हाताला लागलं. मग झटकन केसाळ शेपटीने हेलनच्या चेहऱ्यावर एक फटका दिला.

हेलेन आपल्या कुटुंबातील दूध देणारी गाय बघू शकत नव्हती. पण हेलनला स्पर्श करायला आवडत असे. हेलन केलर जीवनभर अंध आणि बहरी होती. ती जगाला केवळ स्पर्श, स्वाद आणि गंधाने समजून घेऊ शके.



हेलेनचा जन्म १८८० मध्ये टस्कुम्बिया, अलबामात झाला.

जेव्हा ती छोटी मुलगी होती तेव्हा ती खूप आजारी पडली.

आजाराने तिची बघण्याची आणि ऐकण्याची क्षमता हिसकावून घेतली.

हेलेन आपल्या भावांचे हसू आणि आपल्या आईचा आवाज सुद्धा ऐकू शकत नसे.

ती आपल्या वडिलांच्या चेहऱ्यावरील हास्य किंवा खिडकीच्या बाहेरचे सुंदर फुल सुद्धा बघू शकत नसे.

हेलेनच्या जीवनात केवला शांतता आणि घनघोर अंधार होता.

बोलता येण्यासती मुलांनी शब्द ऐकणे गरजेचे असते.

पण हेलेनला काहीच ऐकू येत नसे.

म्हणून ती बोलू शकत नव्हती.

त्याऐवजी ती खाणाखुणा करून बोलत असे.

जेव्हा तिला आई हवी असे तेव्हा ती आपला हात चेहऱ्यावर ठेवत असे.

जेव्हा तिला आपले वडील हवे असत, तेव्हा ती चष्मा घालण्याची खुण करत असे.

जेव्हा तिला भूक लागत असे, तेव्हा ती पावाचे तुकडे करण्याचा आणि लोणी लावण्याचा अभिनय करत असे.



हेलेनला माहीत होते की ती आपल्या परिवारातल्या इतर लोकांपेक्षा वेगळी आहे. जेव्हा परिवारातल्या लोकांना काही हवे असे तेव्हा ते आपले ओठ हलवत असत. कधीकधी जेव्हा दोनजण बोलत असत तेव्हा हेलेन त्यांच्या मध्ये जाऊन उभी राहत असे. ते आपल्या ओठांवर तिची बोटे ठेवत असत. मग ती आपले ओठ हलवण्याचा प्रयत्न करत असे. पण तरीही कोणी तिचे बोलणे समजू शकत नसे.

यामुळे हेलेनला राग येत असे. कधी कधी ती ओरडत असे आणि रडत असे आणि कितीतरी वेळ पाय झाडत असे.

ती वस्तू फेकत असे आणि लोकांना मारत असे.

पण त्यामुळे काहीच बदलले नाही. तो अजूनही आत गप्प गप्प आणि अंधारात एकटी राहत होती.





हेलेनला नियंत्रित करणे कठीण होते.

तिच्या आईवडिलांना समजत नव्हते की तिला मदत कशी करायची ते.

ते तिला डॉक्टरांकडे घेऊन गेले.

पण कोणीही डॉक्टर हेलेनला परत दिसण्यासाठी आणि ऐकू येण्यासाठी मदत करू शकला नाही.

जेव्हा हेलेन सहा वर्षाची झाली, तेव्हा एका डॉक्टरने केलरला, डॉ. अलेक्जेंडर ग्राहम बेल यांना भेटण्यास सुचवले.

डॉ. बेल, टेलीफोनच्या शोधासाठी प्रसिद्ध होते.त्यांनी बहिऱ्या लोकांनाही शिकवले होते.

डॉ बेलने मिस्टर केलर यांना बोस्टनमध्ये मायकल एनाग्नोस यांना पत्र लिहायला सांगितले.

मिस्टर एनाग्नोस *पर्किन्स इंस्टीट्यूशन फॉर द ब्लाइंडचे* प्रमुख होते.

डॉ बेल यांचे म्हणणे होते की हेलन आपल्या आत बंद केलेले विचार बाहेर काढायला शिकू शकते.

मिस्टर एनाग्नोसने हेलेनसाठी एक शिक्षिका पाठवण्याचे वचन दिले.

## हेलेनची शिक्षिका

## मार्च १८८७

हेलेनची शिक्षिका तिच्याकडे वसंतामध्ये राहायला आली.

त्यांचे नाव एनी सुलिवन होते.

एनी पर्किन्स शाळेत शिकली होती. ती जवळजवळ अंध होती.

ऐनीने हेलेनचे जंगली वागणे नियंत्रित करण्याचा प्रयत्न केला ज्यामुळे ती काही शिकू शकेल.

पण हेलेनला समजले नाही की एनी तिला मदत करू इच्छित होती.

दोन आठवड्यापर्यंत हेलेनने एनीबरोबर खूप भांडणे केली.

तिने एनीला मारले आणि तिचा समोरचा दाट तोडला.

एक दिवस हेलेनने एनीला वरच्या खोलीत बंद केले.

मग मिस्टर केलर यांना एक शिडी आणावी लागली आणि एनीला खिडकीतून बाहेर काढलं.



तरीही एनीने हार मानली नाही.

हळूहळू हेलेनला, आपल्या नवीन शिक्षिके वर विश्वास वाटू लागला.

ऐनीने हेलेनला शब्दांच्याबाबत शिकवायला सुरुवात केली.

तिने आपल्या बोटांचा उपयोग करून शब्दांचे हिस्से केले.

तिने हाताने प्रत्येक अक्षरासाठी एक वेगळी आकृती तयार केली.

तिने प्रत्येक आकृती हेलेनच्या हातावर दाबून काढून दाखवली. जेव्हा तिने हेलनला केक दिला तेव्हा हेलेनच्या हातावर केक लिहले.

जेव्हा हेलनने आपली बाहुली घेतली, तेव्हा एनीने हेलनच्या हातावर doll (बाहुली) लिहले.

हेलेनने आकृतीची नक्कल केली.

हेलेनला तो एक खेळ वाटला.

तिला माहीत नव्हते की त्या आकृत्यांमध्ये शब्दांचे वर्ण होते.



एक महिन्यानंतर, ऐनी जे वर्ण लिहीत होती, हेलन सुधा तेच लिहू शकत होती. पण हेलनला अजून हे माहीत नव्हते की ज्या गोष्टींना ती स्पर्श करत होती, त्यांना काही नावं आहेत.

एक दिवस हेलेन आणि एनी विहिरीजवळ गेले.

कोणीतरी हाफश्यावर पाणी भरत होते.

एनीने हेलेनच्या हातावर वाहते पाणी पडू दिले.

हेलेनने आपल्या हातावर थंड पाण्याचा स्पर्श अनुभवला.

तिने अनुभव घेतला की तिची शिक्षिका तिच्या दुसऱ्या हातावर W-A-T-E-R (पाणी) लिहीत होती.

परत परत, एनीने त्या शब्दाचे उच्चारण केले.

अचानक हेलेन एकदम स्थिर उभी राहिली.

अचानक तिला समजले.

तिच्या हातावर वाहणाऱ्या गोष्टीला एक नाव आहे. ते W-A-T-E-R (पाणी) होते.





प्रत्येक गोष्टीला एक नाव असते. हेलनला ते सगळं शिकायची इच्छा होती. मग ती एका वस्तू कडून दुसऱ्या वस्तू कडे धावत राहिली.एनीने हेलनने स्पर्श केलेल्या सगळ्या वस्तूंचे नाव लिहले. मग हेलन वळली आणि तिने एनीकडे इशारा केला. T-E-A-C-H-E-R (शिक्षिका) एनीने अक्षरे लिहिली. तेव्हापासून एनीला हेलन “टीचर” म्हणू लागली. त्या उन्हाळ्यात हेलनने खूप नवीन शब्द शिकले. तिने आपल्या जुन्या खुणा आणि संकेतांचा उपयोग करणे बंद केले.

तिला जे शब्द हवे असत ते तिला आपल्या बोटांवर सापडत असत.

एनीने हेलेनला एक-एक शब्द शिकवला नाही.

एनी, हेलेनशी पूर्ण वाक्यात बोलत असे.

अशा प्रकारे, हेलेनने नवीन शब्दांशिवाय खूप काही शिकून घेतले. ती नवनवीन विचार शिकली.

हेलेन आणि एनीने जंगल आणि नदीच्या किनाऱ्यावर मोठी सहल केली.

सहलीत सुद्धा एनीने हेलेनला शिकवण दिली.

तिने हेलेनला बी अंकुरतांना आणि रोपं वाढत असतांना दाखवले.

एनीने मातीचे डोंगर तयार केले आणि हेलनला ज्वालामुखीच्याबाबत शिकवले.

कधी-कधी दोघी एखाद्या झाडावर बसत आणि तिथेच त्यांचा वर्ग चालत असे.



हेलेनमध्ये ज्ञानाची ज़बरदस्त भूक होती.

हेलेनला ते सगळं शिकायची इच्छा होती जे एनी तिला शिकवू शकत होती.

लवकरच एनीने हेलेनला वाचायला शिकवायला सुरुवात केली.

नेत्रहीन लोकांच्या पुस्तकात शब्द वर आलेल्या अक्षरामध्ये लपलेले असतात.

हेलेनने आपल्या बोटांनी त्या शब्दांचा अनुभव घेतला.

तिला त्या शब्दांचा शोध घ्यायला आवडत होते जे तिला आधीच माहीत होते.

जेव्हा ती चांगलं वाचायला शिकली तेव्हा ती आपली पुस्तकं परत परत वाचू लागली.

तिच्या  जिज्ञासु बोटांनी परत परत स्पर्श केल्याने ब्रेलचे वर आलेले शब्द खाली दबले गेले.





हेलेन लिहायला पण शिकली.

तिने आपल्या परिवाराला आणि डॉ. बेल यांना पत्र लिहले.

तिने बॉस्टनमधल्या मिस्टर एनाग्नोस यांनाही काही पत्रं लिहली.

हेलेन इतकं शिकली हे बघून मिस्टर एनाग्नोस खूप चकित झाले.

त्यांनी हेलेनची काही पत्रे प्रकाशित केली. त्यानंतर पत्रकारांनी सुद्धा हेलेनच्या बाबतीत लिहायला सुरुवात केली.

लवकरच हेलेन प्रसिद्ध झाली.

पूर्ण जगातल्या लोकांना या चमत्कारी मुलीबद्दल जाणून घेण्याची इच्छा होती.

आणि हेलेनला पूर्ण जगाबद्दल जाणून घेण्याची इच्छा होती.



# प्रवास

## मे १८८८

आठ वर्षाची हेलेन आपल्या शिक्षिका आणि आई बरोबर रेल्वेत बसली.

ती *पर्किन्स इंस्टीट्यूशन फॉर द ब्लाइंड* बघण्यासाठी बॉस्टनला जात होती.

हेलेनला त्या सगळ्या ग्रामीण भागाबद्दल जाणून घेण्याची इच्छा होती जो रेल्वेतून तिच्या मागे जात होता.

ऐनीने खिड़कीच्या बाहेर जे काही पाहिलं ते सर्व तिने हेलेनच्या हातावर लिहलं.

त्यांनी पहाड, नद्या, जंगल आणि कापसाच्या शेताचे वर्णन केले.



पर्किन्स स्कूलमध्ये हेलेन, मिस्टर एनाग्नोस यांना भेटली.

ती त्या मुलांना सुद्धा भेटली जी आपल्या बोटांनी गप्पा मारत असत.

“दुसऱ्या मुलांबरोबर आपल्या भाषेत बोलण्यात किती आनंद मिळतो.” हेलनने लिहले.

हेलेन प्रथमच समुद्राजवळ गेली.

यापूर्वी तिने फक्त पुस्तकातच समुद्राबद्दल वाचलं होतं.

ती लगेच समुद्राच्या पाण्याकडे धावली. मग ती एका खडकाचा धक्का लागून घसरली. पाणी लवकरच तिच्या डोक्यावरून वाहू लागले. लाट्यांनी तिला मागेपुढे फेकले.



असे वाटत होते की लाट्या तिच्याबरोबर काही खेळ खेळत होत्या.

शेवटी, ती संघर्ष करत किनाऱ्यावर आली. ती कापत होती आणि धापा टाकत होती. तरीही ती आपल्या शिक्षिकेच्या हाता पर्यंत पोहोचली. “पाण्यात मीठ कोणी टाकले?” तिने विचारले.

तिला हे कोणी सांगितले नव्हते की समुद्राचे पाणी खारट असते.



हळूहळू हेलेनसाठी जग उघडले.

तीन वर्षात ती आपल्या बोटांच्या साहय्याने वाचायला आणि लिहायला शिकली.

ती थोडेसे फ्रेंच आणि लॅटिन समजू शकत होती. प्रत्येकजण आश्चर्यचकित होत होता की हेलेन एवढं कसं शिकू शकली.

पण हेलेनला अजून खूप काही शिकायची इच्छा होती.

तिला इतर लोकांसारखे बोलण्याची इच्छा होती.

तिला आपल्या छोट्या बहिणीबरोबर बोलायचे होते.

तिला वाटे की जेव्हा ती बोलावेल तेव्हा तिचा कुत्रा तिच्याजवळ यावा.

तिने बोलण्याची काहीतरी पद्धत शोधण्यासाठी मदत करावी अशी विनंती एनीला केली.

जेव्हा हेलेन १० वर्षाची झाली तेव्हा एनी तिला बॉस्टनच्या शाळेत घेऊन आली.

तिथल्या शिक्षिकेने हेलेनला आपल्या बोटांच्या साहय्याने लोकांचे ओठ वाचायला शिकवले.



हेलेनने आपला हात एका वक्त्याच्या ओठावर, नाकावर आणि गळ्यावर ठेवला.

ती शब्दांचा अनुभव घ्यायला शिकली.

मग तिने आपला आवाज काढण्याचा प्रयत्न केला.

पण तिचा आवाज कधीच बरोबर निघाला नाही.



काही वर्षानंतर, हेलेनने न्यूयॉर्क शहरातल्या मुकबधीरांच्या शाळेत प्रवेश घेतला.

हेलेनचे, न्यूयॉर्कवर प्रेम होते. ती आणि एनी सेन्ट्रल पार्क मध्ये घोडेस्वारी करत असत.

हेलेन इतर विद्यार्थाबरोबर,स्लेजची मजा घेई. एकदा ती "स्टॅच्यू ऑफ लिबर्टी" च्या खडकावर चढली.



हेलेन, काही प्रसिद्ध लोकांना सुद्धा भेटली.

जेव्हा ती लेखक मार्क ट्वेनला भेटली, तेव्हा ते एकदा भेटताच दोस्त झाले.

मार्क ट्वेनच्या मज़ेदार गोष्टींनी हेलेनला इतकं हसवलं की ती रडू लागली.

तरीही एका गोष्टीमुळे हेलेनला नेहमी दुःख होई.

तिने आपले भाषण अधिक चांगले करण्यासाठी दिवसरात्र काम केले.

पण तरीही ती स्वच्छ आणि स्पष्ट बोलू शकली नाही.

हेलेनने ठरवले की ती आपल्या निराशेला आपल्या स्वप्नं पूर्ण करण्याच्या आड येऊ देणार नाही.




## अधिक जाणण्यासाठी

### ऑक्टोबर १८९६

१६ वर्षाच्या वयात, हेलेन एक युवा महिला होती.

ती उंच आणि सुदृढ होती.

तिला चेष्टा-मस्करी करण्याची सवय होती.

तिला होडीत बसायला आणि पोहायला आवडत असे.ती स्वतः होडी चालवू शकत असे.

ती किनाऱ्यावर उगवणाऱ्या रोपांचा सुगंध घेई.

हेलेनने नेहमी कॉलेजमध्ये जाण्याचे स्वप्नं बघितले.

कॉलेजच्या तयारीसाठी हेलेनने *केम्ब्रिज स्कूल फॉर यंग लेडीज मध्ये* प्रवेश घेतला.



आतापर्यंत, हेलेन बधिर किंवा नेत्रहीन विद्यार्थांच्या शाळेतच शिकली होती,

या नव्या शाळेत ती त्या मुलींबरोबर राहू लागली ज्या बघू आणि ऐकू शकत होत्या.

आता ती खेळ खेळत असे आणि त्यांच्याबरोबर लांबवर फिरायला जात असे.

पण तिच्या नव्या शाळेतले सगळे विद्यार्थी तिच्याशी एनीच्या माध्यमातूनच बोलत असत.

कारण त्या विद्यार्थांना बोटांच्या साहय्याने बोलता येत नसे.

ऐनी, हेलेनच्या बरोबर सगळ्या वर्गांना जात असे. ती शिकवतांना हेलेनच्या हातावर हात ठेवत असे. हेलेन इतर विद्यार्थांसारखी नोट्स लिहू शकत नसे. पण तिचे हात ऐकण्यात 'मग्न' असत. हेलेनने खूप मेहनतीने अभ्यास केला. चार वर्षानंतर, ती कॉलेजसाठी तयार झाली.

१९००च्या पानगळीच्या वेळेस हेलेनने के *रैडक्लिफ कॉलेज* मध्ये प्रवेश घेतला.

ती कॉलेजला जाणारी पहिली मुकबधीर-अंध विद्यार्थिनी होती.

नेहमीप्रमाणे, हेलेनला सगळं काही शिकण्याची इच्छा होती जे ती करू शकत होती.

तिने अनेक विषय अभ्यासले.

लेखन तिचा सगळ्यात आवडीचा विषय होता.

तिने समुद्रातल्या आपल्या पहिल्या डुबकीविषयी लिहले.

तिने लिहले की ती कशी बर्फावर सूर्याची किरणे चमकतांना बघू शकत होती.

एका वर्तमानपत्राच्या संपादकाने हेलेनच्या कथांविषयी ऐकले.

संपादकाला माहीत होते की इतर लोकांना सुद्धा ते वाचायला आवडेल.

लोकांना त्या मुलीविषयी माहीती करून घेऊ इच्छित होते की जी आपल्या सुन्न, काळ्या, अंधाऱ्या जगातून बाहेर निघाली होती.



संपादकाने हेलेनला त्याच्या वर्तमानपत्रासाठी तिच्या जीवनाच्याबाबत लेख लिहायला सांगितले.

हेलेनने त्या गोष्टीचे रुपांतर एका पुस्तकात केले.

तिच्या पुस्तकाचे नाव होते *"द स्टोरी ऑफ माई लाइफ".*

ते पुस्तक १९०३ मध्ये प्रकाशित झाले.

वर्तमानपत्रांनी हेलेनच्या पुस्तकाची खूप प्रशंसा केली.

हेलेनचे मित्र मार्क ट्वेन यांनी एक अभिनंदनपर पत्र लिहले.

हेलेन जगाला खूप काही सांगू इच्छित होती.

शेवटी, तिला रक रस्ता मिळाला.

तिच्या पुस्तकाने पूर्ण जगाला तिच्या अद्भुत जगाबद्दल सांगितले.





## अंतिम शब्द

हेलेनने १९०४ मध्ये रैडक्लिफ कॉलेजची पदवी मिळाली.त्यांनी आपले जीवन मुकबधीर आणि अंध लोकांना मदत करण्यासाठी व्यतीत केले. जरी त्यांना कधी तितके स्पष्ट बोलता आले नाही जितके त्यांना हवे होते, त्यांनी *अमेरिकन फाउंडेशन फॉर द ब्लाइंड* साठी पैसे जमा करण्यासाठी व्याख्याने दिली. त्यांनी आपले जीवन आणी शिक्षिकेबद्दल लेख आणि पुस्तक लिहले.

एनी सुलिवन यांचा मृत्यु १९३६ मध्ये झाला. एनी आपल्या मृत्यूपर्यंत हेलेनच्या बरोबर राहिल्या. दोघी ५० वर्षापर्यंत एकमेकींच्या बरोबर राहत होत्या. एक वर्षानंतर हेलेनने अंधाच्या मदतीसाठी जगाचा दौरा करायला सुरुवात केली. आपल्या जीवनाच्या अंता पर्यंत त्यांनी ३५ देशांची प्रवास केला.

हेलेन आपल्या पूर्ण आयुष्यभर प्रसिद्ध होती. जेव्हा ती आठ वर्षाची झाली तेव्हा ती अमेरिकेच्या राष्ट्रपतीला भेटली. त्यांनी आपल्या जीवनावर असलेल्या दोन चित्रपटात अभिनय केला. त्यातील *द अनकॉनक्वेर्ड* ने १९५५ मध्ये एक अकादमी पुरस्कार मिळवला. हेलेन आणि एनीच्या बाबत एक प्रसिद्ध नाटक, *द मिरेकल वर्कर* पण लिहले गेले होते.

हेलेन जिथे जाई, तिथे तिला भेटायला येणाऱ्या लोकांना ती मंत्रमुग्ध आणि चकित करत असे. ती लोकांना आठवण करून देई की कठोर मेहनतीमुळे कोणीही आपले स्वप्न पूर्ण करू शकते.

## महत्वपूर्ण तिथी

१८८० —हेलेन एडम्स केलरचा जन्म २७ जूनला अलबामाच्या टस्कुम्बिया मध्ये झाला.

१८८१ —हेलेन एका आजारानंतर बहिरी आणि अंध झाली होती.

१८८७ —एनी सुलिवन, हेलेनला शिकवण्यासाठी टस्कुम्बियाला आली होती.

१८९४ —हेलेन शाळेत जाण्यासाठी न्यूयॉर्क शहरात गेली.

१८९६ —हेलेनने *केम्ब्रिज स्कूल फॉर यंग लेडीज़* मध्ये प्रशिक्षण घेतले.

१९०० —हेलेनने *रैडक्लिफ कॉलेजमध्ये* प्रवेश घेतला.

१९०३ —हेलेनचे पहिले पुस्तक, *द स्टोरी ऑफ माई लाइफ* प्रकाशित झाले.

१९०४ —रैडक्लिफ कॉलेजमधून हेलेन पदवी घेतली.

१९२४ —हेलेनने *अमेरिकन फाउंडेशन फॉर द ब्लाइंडसाठी काम सुरु केले.*

१९३६ —एनी सुलिवनचे निधन.

१९६४ —राष्ट्रपती लिंडन जॉनसन द्वारा हेलेनला *स्वतंत्रतेचे राष्ट्रपती पदकाने* सम्मानित केले.

१९६८—हेलेनचे कनेक्टिकटमध्ये वयाच्या ८७ व्या वर्षी 1 जूनला निधन झाले.

१९९६ —*"द स्टोरी ऑफ माई लाइफ" ला* न्यूयॉर्क पब्लिक लायब्ररीच्या *बुक्स ऑफ द सेंचुरी साठी नामांकन केले गेले.*